आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत केंद्र पुरस्कृत कृषि उन्नती योजना,कृषी यांत्रिकीकरण उपअभियान या योजनेंतर्गत सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिताचा अखर्चित निधी **सन २०१९-२० च्या अर्थसंकल्पित** निधीतुन वितरीत करणेबाबत.

**केंद्र हिस्सा (लेखाशिर्ष २४०१ A४५९)**

**राज्य हिस्सा (लेखाशिर्ष २४०१ A४४१)**

**महाराष्ट्र शासन**

**आदिवासी विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१९ / प्र.क्र. ०७ / कार्यासन.६**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

तारीख: ८ नोव्हेंबर, २०१९.

**वाचा -**

१) वि. वि, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९ /प्र.क्र.४४ / अर्थ-३, दि. ०१.०४.२०१९.

२) वि. वि, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९ /प्र.क्र.९२ / अर्थ-३, दि. ०८.०७.२०१९

३) केंद्र शासन, कृषि आणि शेतकरी कल्याण मंत्रालयाचे पत्र क्रमांक.No.३-१ MAHARASHTRA /२०१५-M&T (I&P) दि.जून, २०१९.

३) कृषि व पदुम विभाग, नस्ती क्र. कृयांयो-०७१९ / प्र. क्र.१८२ (भाग-२)/१४-अे

**शासन निर्णय-**

केंद्र पुरस्कृत कृषि उन्नती योजना,कृषी यांत्रिकीकरण उपअभियान या योजनेंतर्गत अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी सन २०१९-२० या आर्थिक वर्षात मागणी क्र. टी-५, २४०१ पीक संवर्धन, ७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना राज्य योजनांतर्गत योजना, (०१) (११) कृषि उन्नती योजना,कृषी यांत्रिकीकरण उपअभियान (केंद्र पुरस्कृत योजना ) लेखाशिर्ष २४०१ A४५९ (केंद्र हिस्सा) , ३३-अर्थसहाय्य खाली रु. १५६१.५६ लाख इतका तर (०१) (१०) कृषि उन्नती योजना,कृषी अभियांत्रिकीकरण उपअभियान (कें.पु.यो.राज्य हिस्सा) लेखाशिर्ष २४०१ A४४१, ३३-अर्थसहाय्य खाली रु. १०००.००लाख इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे.

कृषि व पदुम विभागाच्या संदर्भाधीन क्र. ४ येथील प्रस्तावास अनुसरुन सन २०१८-१९ या वर्षातील अखर्चित निधी करीता उपरोक्त सन २०१९-२० करीता अर्थसंकल्पीत तरतुदीतुन (०१) (११) कृषि उन्नती योजना,कृषी अभियांत्रिकीकरण (केंद्र पुरस्कृत योजना ) लेखाशिर्ष २४०१ A४५९ (केंद्र हिस्सा) , ३३- अर्थसहाय्य याकरीता खाली रु.१०११.२१ लाख इतका तर (०१) (१०) कृषि उन्नती योजना,कृषी अभियांत्रिकीकरण (कें.पु.यो.राज्य हिस्सा) लेखाशिर्ष २४०१ A४४१, ३३-अर्थसहाय्य याकरीता रु.६७४.१४२ लाख असा एकुण १६८५.३५ लाख इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव, (कृषि व पदुम) विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS ) वितरीत करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. नियंत्रण अधिकारी / विभागप्रमुख यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी

उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास; आदिवासी विकास विभाग व कृषि व पदुम विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत सूचना देण्यात यावी.

३. नियंत्रक अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. तसेच आदिवासी उपयोजनेंतर्गत वितरीत निधी केवळ आदिवासी लाभार्थ्यांकरिताच उपयोगात येईल याची दक्षता घेण्यात यावी.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाने **वाचा** येथील क्रमांक १ व २ येथील परिपत्रकान्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २१८/२०१९ व्यय १, दि.२९/०६/२०१९ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९११०७१५५४३६१७२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ravindra Digambarrao Aute

Digitally signed by Ravindra Digambarrao Aute
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, cn=Ravindra Digambarrao Aute
Date: 2019.11.08 15:56:47 +05'30'

**( रविंद्र दि. औटे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. प्रधान सचिव ( कृषि ) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त, कृषि, महाराष्ट्र राज्य.
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
५. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९ ), मंत्रालय, मुंबई.

६. कृषि व पदुम विभाग मंत्रालय, मुंबई.

७. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.

८. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.

९. कार्यासन क्र. २ व ९, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

१०. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग